त्यांची चर्चा करीत बसून त्या कठोर कारागारात हे हिंदुस्थाना! तुझ्यासाठी तुझ्यापासून हिसडून नेले गेलेले तुझे तरुण तुझी चिंता वाहत असत. आपल्या शारीरिक पीडेसही वेळेवर विसरत. ते राजबंदी आपल्या मातृभूमीचा हात हातात धरून तिच्या नाडीचे ठोके परीक्षित आणि त्यावरून तिच्या स्वास्थ्याविषयी चिंतातुर हर्षविषाद अनुभवीत त्या अंदमानात दिवस कंठित असत!

## बातमीत आणखी अेक मार्ग

चलान आणि कचराडाक सोडून बातमीचा तिसरा अुपाय, बाहेरच्या काही सहानुभूती बाळगणाऱ्या हिंदी गृहस्थांकडे कारागारातील कामे करून बाहेर जाणाऱ्या लहानसहान अधिकाऱ्यांस धाडणे हा होय. ते बाहेरचे सहानुभूती बाळगणारे लोक वर्तमानपत्रे वाचणारे क्वचितच असत. ते आमच्यासाठी म्हणून जरी वाचू लागले तरी त्यांनी कळवलेली बातमी तोंडी आणण्याची बुद्धिशक्ती बहुधा त्या बाहेर जाणाऱ्या अशिक्षित मित्रास नसे. बातमी लिहून देण्यास आणि आणण्यास धारिष्ट करणारा हजारात अेखादा तसे कोणी केल्याचे अुघडकीस येताच बाहेरच्या लोकांस अितका छळ साहजिकपणेच सोसावा लागे की, त्यास तसे करण्याचा आग्रह निदान मी तरी कधीही करीत नसे. परंतु अशा ठिकाणी परिस्थितीतही तसे धाडस करून राजबंदीवानांना महत्त्वाचा अेखादा वर्तमानपत्री तुकडा धाडण्याचे आणि तो घेअून आत येण्याचे साहस करणारे लोक त्या 'पाण्याच्या वसाहतीत' ही निघत असत. अशा साहसी लोकांस केव्हा केव्हा ते धरले गेल्याने कडक शिक्षा होत, नोकऱ्या जात, पण पुनः कोणी ना कोणी धजेच. राजबंदीवानांच्या संगतीने आणि अुपदेशाने आणि जसजशी देशभक्तीची बीजे साधारण जनतेच्या आणि बंदी जगताच्या अंतःकरणात रुजली गेली तसतशी ही साहसाची सेवा ते कर्तव्य म्हणून करू लागले. पण पहिल्या दोन-तीन वर्षांत मात्र वर्तमानपत्राचा बोटभर तुकडा कोणी बंदीवानाने आणावा म्हणून नाही नाही त्या प्रकारे त्यांची विनवणी करावी लागे. कित्येक वेळा त्यांस दुसरे काही आमिष दाखविण्याचे सामर्थ्य नसल्याने राजबंदीवानांनी आपली भाकर त्यास द्यावी आणि दिवसभर अर्धपोटी देखील राहावे की संध्याकाळी स्वदेशभूमीचा अेखादा तरी निरोप अैकावयास मिळावा.

कधी कारागाराचे भिंतीवरून फेकलेले तर कधी थाळीमध्ये बाहेरून घुसडून ठेवलेले, नाळीत आतून हात घालून काढून घेअून अशा अनेक युक्त्यांनी तुकडेताकडे जमवून वाचावे. याविना आणखी अेक मार्ग म्हणजे, कोणा अधिकाऱ्याचे तोंडून चुकून वा सहानुभूतिपूर्वक अेखादी बातमी निघून गेली तर तो, या मार्गाने केव्हा केव्हा स्वतः बारीसाहेबही बातमीदाराचे काम करीत असत! पण त्यांचे वरदान सदोदित शापगर्भच असे. हिंदुस्थानाला प्रतिकूल, राजबंदीवानांस आपल्या पक्षाच्या अशक्ततेची व आपल्या आशांच्या वैफल्याची जाणीव होअून ज्यायोगे त्यांचा निरुत्साह होण्याचा संभव असेल अशा बातम्या बारीसाहेब स्वतः होअून आणि तेही अुपकार म्हणून आम्हांला सांगत असत आणि आम्ही त्यावर काय टीकाटिपणी करतो ते आपल्या दैनंदिनीत (डायरीत) टिपून ठेवीत. परंतु तरीही आम्ही त्या बातम्या सांगितल्याविषयी त्यांचे आभारच मानीत असू. कारण अनुकूल तीच बातमी अैकणे ही प्रीतीची आवड नैसर्गिक असली तरी आपल्या प्रियकराची प्रतिकूल बातमीही अैकणे हे वीरांचे कर्तव्यच आहे. अनुकूल बातमीने प्रीती संतुष्ट होते तर प्रतिकूल बातमीने भक्तीचे व धृतीचे बाहू फुरफुरू लागून त्या प्रतिकुलापासून प्रेमाची सुटका करण्यास्तव प्राणाचे होम करण्यास वीरता सज्ज होते. अशा प्रतिकूल बातम्या बारीसाहेब कशी देत आणि देववीत ह्यांची काही अुदाहरणे पुढे येतीलच. अेकच येथे स्पष्टीकरणार्थ म्हणून सांगणे पुरे आहे. देशभक्त नामदार गोखले जेव्हा वारले तेव्हा ती बातमी मी संध्याकाळी जेवत असता बारीसाहेबांनी कारागारात येअून मला सांगितली. (Well, you always want news, Mr. Savarkar, here is something for you, Gokhale is dead!) सावरकर, तुम्हाला नेहमी बातमी हवी असते नाही? ही घ्या बातमी. गोखले वारले.

## गोखले वारले!

मला क्षणभर ते खरे वाटेना. अितकी अकल्पित ती बातमी होती. मी दुःखोद्गार काढलेले पाहून बारी म्हणाले, ''पण ते तुमच्याविरुद्ध होते ना?'' मी म्हटले ''छे छे! मी त्यांच्याच महाविद्यालयात शिक्षण घेतले आहे. मतभेद असेल,

विरोध नव्हे. ते आमच्या हिंदुस्थानातील ह्या पिढीतले अेक निस्सीम देशभक्त आणि देशसेवक होऊन गेले.'' पण बारी म्हणाले, ''तुमच्या खटल्यात त्यांच्या विरुद्ध तुम्ही भयंकर कट केल्याचा पुरावा आलेला होता तो? आणि तुम्हास धरल्याविना हिंदुस्थानात शांतता प्रस्थापित होणार नाही असे ते म्हणाले होते ना?'' मी अुत्तरलो ''त्याविषयी दंतकथांवर विश्वास ठेवण्यात अर्थ नाही. त्यांची माझी प्रत्यक्ष संभाषणे झाली आहेत आणि आम्हां दोघांविषयी परस्पर दोघांसही अत्यंत पूज्यबुद्धी वाटत असे हे त्या भाषणाचे वेळी अुपस्थित असलेल्या गृहस्थांस माहीत आहे. त्यांस देशहिताचे दृष्टीने माझा मार्ग क्वचित मान्य नसेल. पण म्हणून त्यांच्या देशभक्तीची थोरवी लेशमात्र अुणी होत नाही आणि कटाविषयी विचाराल तर अिंग्लंडमध्ये त्यांच्या अेकदोन विरुद्ध भाषणांनी प्रक्षुब्ध होअून जेव्हा अभिनव भारतातील काही पुढारी त्यांच्यावर आक्रमण करण्याच्या गोष्टी गुप्त बैठकीत बोलले तेव्हा त्या अमंगल विचाराचा तीव्र निषेध करून प्रामाणिक मतभिन्नतेसाठी कोणावरही आक्रमण करणे आणि तेही स्वजनांवर करणे हे घोर पातक आहे, हा खरा खरा अत्याचार होअील हे मी त्यांस समजावून दिले आणि तो ठराव संमत होअू दिला नाही, ही गोष्ट ते स्वतःच सांगतील. जर प्रत्येक हिंदू गोखल्यांअितका तरी देशभक्त आणि देशसेवक होअील तरीही...!!'' आमचे हे संभाषण बारीने यथाक्रम टिपून ठेवले होते. काही काळाने मला अेकदा ते टिपण पाहावयास मिळाले. त्यात बारीसाहेबांनी साश्चर्य अेक विधान केले होते - आणि हेच विधान ते अितरत्रही करीत की 'वर वर कितीही भिन्न आणि विरोधी दिसले तरी हे महाराष्ट्रीय अंतःकरणातून सर्व अेक आहेत!'

ही गोष्ट सांगताना मला अेका थोर देशभक्ताच्या असल्याच दुसऱ्या एका उक्तीची आठवण होत आहे. अिंग्लंडमध्ये असताना लाला हरदयाळ सांगत की, ते पुण्यास टिळकांस भेटावयास गेले होते. नंतर त्यांचे प्रतिस्पर्धी म्हणून गोखल्यांस भेटावयास गेले. हिंदुस्थानात ते सर्वत्र निरनिराळ्या प्रतिस्पर्धी पुढाऱ्यांस असेच भेटत आलेले होते. त्या समयी त्यांस अेकमेकांविरुद्ध द्वेषपूर्ण निंदा त्या त्या प्रतिस्पर्ध्यांनी केलेली अैकावी लागे. पण टिळकांनी आणि गोखल्यांनी हरदयाळासारख्या होतकरू आणि तेजस्वी तरुणास आपल्या देशसेवेच्या मार्गास अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न जरी केला तरी त्यांच्यापैकी कोणाच्याही तोंडून दुसऱ्याचे विरुद्ध अन्यायाचे वा द्वेषाचे अेक अवाक्षरही निघाले नाही. अुलट प्रत्येकाने दुसऱ्याविषयी अत्यंत आदर दाखविला. टिळकांनी म्हटले ''गोखल्यांसही अेकदा भेटा'' आणि गोखल्यांनी म्हटले ''आपण टिळकांकडे अुतरला ते ठीकच केले. मला माहीत आहे की तरुण पिढी ही त्यांच्याच हाती जाणार आहे!'' ही गोष्ट सांगून लाला हरदयाळ म्हणत, ''परक्यांसमोर अुभे राहताच

## आम्ही अेकशेपाच आहोत

ही भावना आम्हां अितर प्रांतीयांपेक्षा महाराष्ट्रात अधिक प्रमाणात वसत आहे आणि आपसातील वैयक्तिक वैमनस्ये राष्ट्रीय कार्यात विसरून जाण्याची कला महाराष्ट्रीय धुरीणांस अितरांहून अधिक साधलेली आहे, असा मला पुष्कळ वेळा अनुभव आला आहे.''

वर दिलेल्या अनेक अडचणींस अशा अनेक अुपायांनी दूर करीत पहिली दोन-तीन वर्षे राजबंदीवान मोठ्या प्रयासाने हिंदुस्थानाची बातमी आणविण्याची आणि अंदमानाची हिंदुस्थानास पोचविण्याची व्यवस्था करीत असावे. पुढे पुढे त्यांची तेथील स्थिती जशी सुधारत गेली आणि शक्ती वाढत गेली तशी हिंदुस्थानातील पत्रव्यवहार ठेवण्याची ही साधने अधिक परिणामकारक होअू लागली आणि त्यांच्यात नव्या साधनांचीही भर पडली, तिची त्रोटक माहिती यथाक्रम पुढे येअीलच.

या रीतीने थोडेच दिवसांत राजबंद्यांस नक्की माहिती मिळाली की, होतीलालांचे पत्र प्रकाशित केल्यामुळे बंगाली छापखाना जप्त झाला अित्यादी बातम्या बारीने केवळ आपल्या खिशातून काढलेल्या होत्या आणि राजबंद्यांना धाक दाखविण्यासाठी आपल्या हस्तकांचे हस्ते पसरविल्या होत्या. थोडेच दिवसांनी त्या प्रसिद्ध झालेल्या पत्राचा 'बंगाली' पत्रातील तुकडाही आम्हांस कारागारात पाहावयास मिळाला. मला तेलाच्या घाण्यास जुंपले गेले होते ही बातमी प्रथमतः याच वेळी हिंदुस्थानात प्रसिद्ध झाली. ती कोणी नंतर अमेरिकेत कळविली. तेथे अभिनव भारताच्या सभासदांनी ती बातमी मी कोलू ओढीत आहे असे काल्पनिक चित्र काढून आणि त्यावर छापून त्या हस्तपत्रकाच्या शेकडो प्रती

वाटल्या. त्याचा परिणाम तेथल्या हिंदी लोकांवर काय झाला हे पंजाबातील लाहोरच्या कटाची मंडळी अंदमानात जेव्हा आली तेव्हाच्या वृत्तान्तात दिसून येअीलच.

प्रकरण चौदावे

# १९११ च्या राज्यारोहणसमारंभाची

## अंधारकोठडीत पडलेली सावली

मागे सांगितल्याप्रमाणे श्री. होतीलाल यांचे पत्र हिंदुस्थानमध्ये प्रसिद्ध झाल्याने अधिकाऱ्यांमध्ये जी खळबळ अुडाली तिच्या आगेमागेच राजकीय बंदीवानांच्या आशा अेकाअेकी अगदी फलोन्मुख होणार म्हणून दाट वदंता अुठली! वदंता अुठली की, अिंग्लंडात राज्याभिषेक झाल्यानंतर राजे जॉर्ज हे हिंदुस्थानात येणार आणि महिन्या दोन महिन्यांत (म्हणजे डिसेंबर १९११ मध्ये) हिंदुस्थानातही राज्याभिषेकसमारंभ केला जाणार आणि आश्चर्याची गोष्ट ही की, त्या संधीस त्या राज्यारोहणसमारंभाप्रीत्यर्थ सर्व राजकीय बंदीवान – मी देखील सुटणार!

## सुटण्याची आशा

दुष्काळामध्ये अत्यंत अुपाशी लोकांचे थवे जेथे जेथे भिक्षा मागावयास जमविण्यात येतात तेथे भिक्षा आली म्हणताच त्यांच्या आत्म्याची जी तळमळ अुडते आणि मला मिळण्याचे आधीच ती भिक्षा संपून तर जाणार नाहीना म्हणून जिवाची जी असह्य धडपड चालते तीच स्थिती 'ज्युबिली होअेंगी' या शब्दांसरशी सुटका होणार किंवा निदान सूट मिळणार या वदंतेने बंदीवानांच्या वसाहतीची होते. जिकडे तिकडे अेकदम ती बातमी पसरून ज्याच्या त्याच्या तोंडावर अुल्हास दिसू लागतो. आपला क्रमांक अुत्सवाचे वेळी जी नावे जाणार त्यात असणे नसणे हे आपल्या बंदीवासातील वर्तनावर म्हणजेच आपण बंदीवरील अधिकाऱ्यांस किती प्रसन्न करू शकलो यावर अवलंबून आहे हे प्रत्येकास माहीत असल्याने जो तो बंदी अधिकाऱ्यांची शक्य ती हांजी हांजी करू लागतो. अत्यंत त्रासदायक कामेही बिनहरकत व बिनबोभाट होअू लागतात. अधिकारी पण कामे वाढवून त्या संधीचा चोपून फायदा घेतात. कोणी बंदीवान कुटकुटला की आमिष पुढे तळपेच ''भय्या थोडे दिन बाकी हैं, अभी ज्युबिली आती है, तुम्हारा नाम हम सरकारको अुपर भेजनेवाला है!'' आशादायी वातावरणात 'ज्युबिली अुत्सव आता है' ही खरीखोटी वदंता अुठण्याचा अवकाश की बंदीजनांचा तो महिना दीड महिना मोठ्या आनंदात जावयाचा हे ठरलेले. यावज्जन्म काळेपाण्याची शिक्षा झालेल्या आणि काही तरी असंभव घटना घडल्याविना घरी परत जाण्याची, आयुष्यात परत स्वतंत्रतेचे सुख भोगण्याची, काहीही आशा अुरली नसलेल्या त्या अंदमानातील बंदीवानांस असंभवनीय घटनेचीच काय ती आशा धरता येणार.

## अुत्सव आता है!

तशी कोणतीही असंभवनीय घटनेची वार्ता आली की त्यांची आशा साहजिकच त्या घटनेच्या असंभवनीयतेपेक्षा तिच्या अनुकूलतेकडेच अधिक आकर्षित होअी आणि त्यांच्या विश्वासासही आपल्याबरोबर आकर्षून नेअी. त्यामुळे बहुधा दरवर्षी निदान दर दोन-तीन वर्षांनी ''अुत्सव आता है!'' सुटका किंवा सूट तरी मिळणार म्हणून हूल अुठवायचीच आणि निराशेने आणि दु:खाने वेडावलेले बंदीवान तिच्यावर ती खोटी ठरेतो विश्वास ठेवून काही दिवस तरी किंचित सुखात घालवायचे असा क्रम अव्याहत चालू असे. आश्चर्य हे की, त्या बातम्या वारंवार खोट्या ठरत असताही त्यांच्यावर त्या अुठविल्या जाताच लोकांचा विश्वास पुन: पूर्ववत बसे आणि कोणी जरी त्या निराशेच्या समुद्रात बुडणाऱ्या लोकांस सांगितले की, ह्या अुत्सवाची वदंताही, तू जीस लोंबकळू पाहतो आहेस ती केवळ कल्पनेची काडी आहे तर त्यास त्याची आशा अशा रीतीने भंग केल्याविषयी राग येअी!

आत्यंतिक संकटात सुटका होणे हे असंभवनीय आहे असे स्वत:ला वाटत असताही तीच निराशेची गोष्ट कोणी दुसऱ्याने सांगितली किंवा त्या संकटातून सुटका होण्याची अेखादी वदंता स्वत:ला अगदी अशक्य आहे, सुटकेची काही अेक आशा नाही, असे वाटत असताही ती वदंता आणि ती आशा खोटी आहे असे दुसऱ्या कोणी म्हटले की, त्या दुसऱ्या तसे म्हणणाऱ्या गृहस्थावरच, आपल्या निराशेचा राग काढण्याचा आणि यावरच संतुष्ट होण्याचा हा मानव मनाचा स्वभाव आमच्या देखील काही वेळा अनुभवास आलेला आहे. जेव्हा हायकोर्टात अेक जन्मठेप झाल्यानंतर दुसरा हत्येचा खटला आमच्यावर भरला गेला तेव्हा नव्याण्णव अंशी आम्हास आता ह्या खटल्यात फाशीची शिक्षा दिली जाणार असी आमची मनोदेवी आम्हास सांगत असे. आम्ही आमच्या मनाची सज्जता मरणास आलिंगिण्यास करीतही होतो. पण तरी अेकदा अेक सहानुभूती बाळगणारे अधिकारी डोंगरीच्या तुरुंगात आम्हास भेटून बोलत असता जेव्हा आम्हास म्हणाले, या वेळेस बहुधा फाशीची शिक्षा होणार तुम्हाला, तेव्हा मनास अकस्मात त्या गृहस्थांचा राग आल्यासारखे वाटले. विवेकाने तो राग कसा आवरावा लागला याची आम्हास अजून आठवण येत आहे.

याच पूर्वप्रसंगाच्या आठवणींनी कठोर आणि निराशाप्रवण बनलेल्या आमच्या मनावर या राज्यारोहणानिमित्त होणाऱ्या अुत्सवात आमची संपूर्ण सुटका होअील, ह्या बातमीचा काहीच विशेष परिणाम झाला नाही. परंतु अितर राजबंदीवानांच्या अुल्हासास पारावर राहिला नाही. जो तो आता आपण परत घरी कधी जाणार, गेल्यावर काय करणार, अितकेच नव्हे आगगाडीच्या कोणत्या फाट्याने कोठे जाणार; अितक्यापर्यंत बेत ठरवून टाकू लागला. त्यातही कित्येकांस यावज्जन्म काळेपाणी तर कित्येकांस १४-१०-७ वर्षे अशा भारी भारी शिक्षा होअून आणि त्यांस त्या शिक्षा देण्यासाठी सरकारने लाखो रुपये खर्ची करून पुरी दीड-दोन वर्षेही झालेली नव्हती. अितक्या थोड्या अवधीत अितक्या पैशाच्या आणि त्रासाच्या कमाअीवर पाणी सोडून त्यांच्यासारख्या भयंकर समजल्या जाणाऱ्या लोकांस कोणी पटकन बंदीगृहाची द्वारे अुघडी टाकून वाटेल तिकडे जाअू देअील हे मला शक्य दिसेना. तथापि, राजकीय अितिहासात अशा प्रकारच्या अशक्य गोष्टीही कधी कधी शक्य होतात, हेही मी आयर्लंड, अिटाली, रशिया अित्यादी अुदाहरणांवरून दाखवले. अगदी निराश जरी मनुष्याने कधीच होता कामा नये तथापि वेडी आशा धरण्यापेक्षा ती न धरणेच कर्मयोगाच्या मार्गात अधिक श्रेयस्करच नव्हे तर सुखकरही होते. अेतदर्थ अितक्या लवकर सुटून जाल ही आशा धरू नका; आपणास येथेच हे कष्ट, निश्चित अवधी सांगणे आज अशक्य आहे अशा काळापर्यंत, काढावे लागणार हेच गृहीत धरून तदनुरूप मनाची सज्जता ठेवा, असे मी माझ्या राजकीय सहतपींना वारंवार सांगत राहिलो. परंतु काही केल्याने त्यांची अुत्सुकता आणि आता आम्ही सुटणारच हा विश्वास कमी होअीना. वर वर्णन केलेल्या मानवी स्वभावानुरूप त्यांतील कित्येक माझ्यावर माझ्या या दुर्मुखलेल्या भविष्यवादासाठी रागावतही. त्यांतही कित्येकांचा विश्वास अरविंदबाबूंच्या अेका भविष्यवाणीवर अवलंबन करीत होता. अरविंदबाबू सुटले तेव्हा त्यांच्याबरोबर ज्या लोकांस कठोर कारावासाच्या आणि द्वीपांतराच्या यावज्जन्मादिक शिक्षा झाल्या होत्या त्यांच्याकडे वळून ते अभियुक्ताच्या पिंजऱ्यामधून बाहेर पडता पडता म्हणाले होते की, ''तरुणांनो जा, तुम्ही आज सुटला नाही चिंता नाही. तीन वर्षांचे आत तुम्ही सर्वजण परत याल!''

## अरविंदबाबूंचे कृष्णदर्शन

अरविंदबाबूंस कारागृहात कृष्णदर्शन झालेले होते. त्यांची भविष्यवाणी खरी होणार असा त्या सर्व मंडळींचा दृढविश्वास. बरे, भविष्यवाणीप्रमाणे जर बंगाली 'बॉंबगोळेवाले' सुटले तर मग आग्रा-पंजाबकडील नुसते लेखणीवाले सुटणार हे व्यवहारवाणीनेही सिद्धच होत होते. आणि अितकी सगळी सेनेची सेना सुटली असता तिघा महाराष्ट्रीय क्रांतिकारकांनाच तेवढे कोण कोंबून ठेवणार? अेतावता सगळे राजबंदीवान सुटणार! हा सगळ्यांचा निर्धार झाला. प्रश्न काय तो अेकच अुरला की, अरविंदबाबूंच्या भविष्यवाणीतील ती तीनचार वर्षे मोजावी कोठून? अनेकांनी मीमांसकांच्या सूक्ष्म समन्वयपद्धतीचा वारंवार अवलंब करून अखेर अनुकूल तेच सत्य आहे असे ठरविले. त्या

डिसेंबरातच ती भविष्यवाणी फलद्रूप होणार आणि तो राज्यारोहणाचा अलौकिक प्रसंगही आलेला; निश्‍चित आम्ही सगळे सुटणार! कोण ती अुत्सुकता! सुटणार!! ज्यांच्या प्रियकर वदनांचे दर्शन जन्माचे अंतरले म्हणून हृदय कासावीस होअी, त्यांची ती प्रियकर वदने काळाने त्यांच्यावर अेकही नवीन सुरकुती पाडण्याचे आधी, जशीची तशीच, अेका दोनतीन वर्षांचे अवधीत, आम्ही परत जाअून पाहणार! अेकमेकांस अेकमेकांच्या घरी जाअून आपल्या या अंदमानातील कठोर छळाच्या दु:खद कथा कौटुंबिक स्नेहाच्या सुखाच्या मांडीवर लोळत सांगणार! झाले. बंगाल्यांस महाराष्ट्रीयांनी आमंत्रणे दिली. पंजाब्यांनी महाराष्ट्रीयांस दिली. आमंत्रणे देखील देअून टाकली.

मलाही आमंत्रणे अर्थातच मिळाली. त्या राजबंदीवानांतील माझ्या भागात जे ठेवलेले होते ते सर्व मजभोवती गोळा होत आणि अगदी निष्कपट आनंदाने अुत्तरी आणि बंगाली अुच्चारात 'तात्या!' म्हणून म्हणत आग्रह करीत ''तात्या, आप जावोंगे, हमारे तात्या अब देशमें जरूर अवश्य जाअेंगे'' म्हणून ते अुदार हृदयी तरुण माझ्या सुटकेची निराशा घालविण्याचा मनापासून प्रयत्न करीत. खरोखरच त्या सर्वांस माझी पन्नास वर्षांची शिक्षा अैकून आणि पाहून अितके वाअीट वाटे की, त्या अुत्सवाप्रीत्यर्थ होणाऱ्या त्यांच्या सुटकेहून माझ्या सुटकेचा त्यांस अधिक आनंद होत होता!

अुत्सव जवळ आला. वदंतांना पारावर राहिला नाही. अंदमानच्या अधिकाऱ्यांनी जिकडे तिकडे चकचकाट करण्यास आरंभ केला. जो तो बंदीवान समजू लागला मी तर सुटणारच!

राज्यारोहणाचा दिवस अुद्या अुजाडणार. तेव्हा जिकडे तिकडे दाट वदंता की, राजकीय बंदीवान सोडण्याची आज्ञा आलीदेखील! सत्ताधिकाऱ्यांस देखील खरोखरच वाटे की हे खास सुटणार. मागून आम्हांस कळले की आत खरोखरच काही शिजत होते. राज्यारोहणसमारंभाच्या दिवसाच्या आधीची ही संध्याकाळ. आम्ही सर्व बंदीवान जेवून अेका ओळीने बसलो होतो. माझे सहकष्टभोगी राजबंदीही माझ्याजवळच बसले; कारण त्या आनंदाच्या गडबडीत जमादारही चूर होता. तोही अुद्या सुटणारच. कोणत्या गाडीने कलकत्त्याहून पुढे जावे हाच विचार काय तो ठरविणे अुरलेले. अितक्यात X X X खान धापा टाकीत आला, आणि माझे हात बळाने आपले हातात दाबून म्हणाला, ''बालिस्टरबाबू, आप छूट गये!'' हा X X X खान म्हणजे दुष्टांतला तिसऱ्या प्रतीचा दुष्ट होता. बारीसाहेबांचा आज्ञेचा ओहळ ज्या तीन मोठमोठ्या गटारांतून अप्रतिहत वेगाने– नव्हे वर्धमान वेगाने वाहत कारागारात पोचे, त्यात XXX खानांचा मुख्य पठाणी जमादारांचा पहिला क्रमांक, XXX यांचा दुसरा आणि XXX खान यांचा तिसरा! बारीबाबांच्या क्रोधाच्या हातातील हे पठाणी त्रिशूळ राजबंदीवानांच्या हृदयात सदा भोसकलेले असावयाचे! त्यांतील हा अेक शूळ X X X खान, पण तो आज अितका बोथट झाला! जेथे त्यांचा लाभालाभ नसेल तेथे दुष्ट, सुष्टही होतात. आज- अुद्या सगळेच सुटणार मग आता माझा द्वेष करून X X X खानास काय मिळणार? क्वचित मी सुटल्यावर बालिस्टर म्हणून त्याच्या अेकाद्या नव्या दरवड्याच्या प्रकरणात त्याच्यावरील खटल्यात अुपयोगी देखील पडेन! नाही कोणी म्हणावे! नव्हे अशा अुघड विनंत्या देखील नेहमी करण्यात येत. तेव्हा माझ्याशी आता स्नेहच लाभकारक असल्याने आणि हानिकारक तरी नसल्याने XXX खान माझे मन:पूर्वक अभिनंदन करू लागला आणि राजबंदीवानांस सांगू लागला!

## बडे बाबू छूट गये!

मी हसत विचारले, ''पण तुम्हास कोणी सांगितले?'' तो म्हणे, ''अहो आता कोणी कशास सांगावयास पाहिजे? स्वत: बारीने आम्हां सर्वांस हुकूम दिला आहे की, अुद्या बाहेरच्या सर्व भागांतील जमादारांस येथे बोलावले आहे म्हणून सांगा. कारण राजबंदीवान सुटताच त्यांस अमक्या बेटात नेणे आहे आणि तेथून बोट येताच तीवर चढविणे आहे!'' पुन: मी म्हटले, ''पण मीही सुटणार हे कशावरून?'' तो म्हणाला, ''मी बारीस विचारले तेव्हा तो हसला!'' त्या अेका साधारण बंदीपालाच्या अेका धूर्त हसण्यावर आमच्या सुटकेच्या बातमीचा हा डोलारा अुभारलेला. 'तथापि बालिस्टरबाबू तुम्ही सुटलेत!' हे शब्द अैकताच माझ्या मनात आनंदाची लहर अुसळावयाची राहिली नाही! अुद्या सुटका झाल्यावर

घरी जाऊन, बाळास जसा सोडला तसा अेका वर्षाचे आत जाऊन हृदयाशी घट्ट घेता येणार! आणि सोडलेले सर्व प्रियजन अेखाद्या दुष्ट स्वप्नातून जागे होताच पटकन घो घो भोवती गोळा होतात तसे हसत गोळा होणार! ही अत्यंत असंभवनीय रमणीय कल्पना मनात भरारून गेली. ती कल्पनाच आहे हे माहीत असताना देखील आनंद देअू लागली! दुर्दैवाच्या दारुण दु:खाचे दिवस कंठीत असता खोटी आशा, ती खोटी आहे हे माहीत असताही, कित्येक वेळा त्या दु:खाची धार किंचित बोथट करण्यास अुपयोगी पडते यात शंका नाही!

ही बातमी अैकताच ते सगळे राजबंदी माझ्या गळा पडले आणि म्हणाले, ''अभी तो विश्वास हुवा.'' आता तर सुटणार ना? मी मानेने नाही म्हणून म्हणताच त्यांतील अेका अत्यंत निर्व्याज सहानुभूती बाळगणाऱ्या अुत्साही तरुण मित्राने माझ्या गळ्यांत जी बंदीवानांची लोखंडी हासळी, जीत क्रमांकाचा आणि शिक्षेचा लाकडी बिल्ला लटकावलेला असतो, ती धरली आणि म्हणाला, ''तुटणार, अुद्या हा बिल्ला तुमच्या गळ्यातून तुटणार!'' मी म्हणालो, ''तुम्ही कोणी सुटाल, मी नाही, तथापि आपणांपैकी अेकजण जरी सर्वस्वी सुटला तरी तितका आनंदच होणार आहे. देशाचे तितके कल्याण अधिकच होणारे आहे.'' माझ्या या अविश्वासीपणाने किंचित त्रासून त्या अुत्साही मित्राने प्रेमळ रागाचे आवेशात माझी लोखंडी हासळी बिल्ला धरून अशी हासडली की तो लाकडी बिल्ला खरोखरच तुटून पडला! माझ्या मानेलाही थोडे खरचटले. परंतु

## हाही शुभ शकुनच

मानून ते आणि ही बातमी अितर भागांत कळताच अितर राजबंदीवान, आता मात्र बालिस्टरबाबू निश्चयाने अुद्या सुटणार म्हणून अधिकच निश्चिंत झाले. ''ह्या तुमच्या शुभ शकुनाचा अेक मात्र निश्चित परिणाम होणार तो म्हणजे, आपला बिल्ला तोडून टाकल्याच्या आरोपावरून आम्हास कारागरिय शिक्षा मिळणार'' म्हणून मीही अेक भविष्य केले. आणि अरविंदबाबूंच्या भविष्यापेक्षा तेच भविष्य अधिक विश्वसनीय ठरले. कारण अखेर जेव्हा तो अपेक्षित

## अुद्या अुजाडला

तेव्हा सर्व राजबंदीवानांस अितर शेकडो बंदीवानांसह कारागृहाचे द्वारापाशी बोलावण्यात आले; पण मला आणि अेका बंगाली युवकास बोलावण्यात आले नाही. सर्व बंदीवान कारागृहाच्या दाराशी ते अुघडते केव्हा किंवा सुटका नसली तरी काही वर्षांची सूट तरी मिळून निदान किलकिले तरी किती होते ह्या अपेक्षेने चंचलित होअून तिकडे पाहू लागले. पर्यवेक्षकसाहेब (सुपरिटेंडंट) आले! नवीन कोरा गणवेष (युनिफॉर्म) घालून बारीसाहेबही आले. राजबंदीवानांस अेका बाजूस नावे घेअून बोलावण्यात येअू लागले. माझ्या नावाचा पत्ता नाही! अखेर ज्यांस बोलावले त्यांत सुदैवाने माझे वडील बंधू होते. त्यांस सांगण्यात आले की, तुम्हास शिक्षेच्या वर्षामागे प्रत्येकी अेक महिना सूट मिळाली आहे! या गणिताप्रमाणे मला पन्नास महिने शिक्षेची सूट तरी मिळावयास पाहिजे होती. पण मला सांगण्यात आले, तुम्हाला

## सुटका नाही; सूटही नाही!

अितर साध्या बंदीवानांसही वर्षामागे अेक महिना सूटच मिळाली. आणखी त्या दिवशी अुत्सवाप्रीत्यर्थ सर्व बंदीवानांस बटाटेभोजन देण्याची अेक विशिष्ट कृपा करण्यात आली. त्या कृपेला मात्र मी सत्पात्र ठरलो. तशा रीतीने सुटका वा सूट न मिळता जॉर्जमहाराजांच्या राज्यारोहणसमारंभाप्रीत्यर्थ आम्हांला अखेर बटाटे-भात काय तो मिळाला, आणि बिल्ला तोडल्याविषयी शिक्षा! क्वचित त्यातही आम्ही आनंदच मानू म्हणूनच की काय संध्याकाळी बारीसाहेब आम्हास जेवत असता येअून सांगते झाले की, माझ्यासारख्या अुभ्या अंदमानात अधिक शिक्षा भोगीत असलेल्या बंदीवानास अेक दिवसाची सूट देखील मिळाली नसल्याने त्यास व्यक्तिश: फार वाअीट वाटत होते तरी ''तुमच्यासारख्या भयंकर क्रांतिकारकास त्याच्या मनातील तेढ जोवर लेशमात्र कमी झाली नाही तोवर काही अेक सूट न देणे हे सरकारचे कर्तव्यच होते. अितर क्रांतिकारक राजबंदीवान म्हणून क्वचित समजले जाअू शकतील पण केवळ हत्यारी म्हणून

(कॉमन मर्डरर म्हणून) सरकार तुम्हाला समजत असल्याने तुम्हास त्या राजबंदीवानांच्या सुटीवर अधिकारही सांगता येणार नाही!'' मी म्हटले, ''हे मला सांगण्यापूर्वीच ठाऊक होते. मी म्हणतच असे की, भयंकर क्रांतिकारक म्हणून हत्यारी अित्यादी अराजनैतिक (नॉनपोलिटिकल) बंदीवानाप्रमाणे मला सूट मिळणार नाही. आणि मी हत्यारी अराजनैतिक बंदीवान म्हणून राजनैतिक बंदीवानाप्रमाणेही सवलतीस पात्र नाही. हा बटाटे-भातही वास्तविक मला माझ्या मनातील तेढ सुटेतो मिळू नये, हाही आपण परत न्यावा.''

कोणत्याही राजबंदीवानाची सुटका न होता आणि मला तर अेक दिवसाचीही सूट न मिळता १९११ चा राज्यरोहणसमारंभ संपला. त्या दिवशी सकाळी कोठड्यांतून जेव्हा राजबंदीवान बाहेर आले होते तेव्हा त्यांपैकी अनेकांस संध्याकाळीच पुनः त्या कोठड्यांत आपण बंद होण्यास येणार नाही, आज संध्याकाळचे आत आपली अुत्सवाप्रीत्यर्थ सुटका होअून आपण आगबोटीची वाट पाहात बंदीशाळेचे बाहेर कोठे तरी असणार ही निश्चिती वाटली होती; परंतु संध्याकाळी पुनः त्या कोठडीचे तोंड पाहावे लागून त्यांना तिच्या जबड्यात पुरून घेण्यासाठी पुनः त्यात शिरावे लागले. बंदीगृहात अत्यंत भयाण, अुदास आणि सर्वांचे तोंडावर निराशेची काळीकभिन्न छाया पसरलेल्या ज्या काही वेळा मला अजून आठवतात त्यांत ती संध्याकाळची वेळ आणि ती रात्र अेक होती!

मला सुटकेची निश्चिती वाटत नसताही परत खोलीत बंद होताना त्या अितरांच्या संसर्गजन्य निराशेच्या बाधेने माझ्याही मनास पछाडण्यास सोडले नाही. त्या दिवशी माझे भविष्य त्या अंधारकोठडीच्या त्या चार भिंतींत चिणलेले होते. त्याच्या बाहेर सर्व निराशा! काळोख!!

वैयक्तिक सुटकांचा प्रश्न मिटला. पण दुसरी अुत्सुकता मनास लागली की, त्या समारंभाचे दिवशी निदान काही तरी नवे अधिकार स्वदेशास मिळाले असतील का? क्रांतीची जी झटपट जीव देत-घेत चार-पाच वर्षे चालली होती, तिचीही मी बातमी मिळविण्याचा प्रयत्न चालविला. बंदीगृहाबाहेर जे थोडे राजबंदीवान धाडण्यात आल्याचे मागे सांगितले आहे आणि जे त्या वसाहतीच्या निरनिराळ्या भागांत पूर्ण कामे करीत ठेवलेले होते त्यांस आजार वगैरे झाला तर बाहेरच्या रुग्णालयात ठेवण्यात येत नसे. कारण बाहेरच्या रुग्णालयात बंदीवान पुष्कळ स्वतंत्रतेने अेकमेकांस भेटू शकत आणि खाण्यापिण्याचीही व्यवस्था बंदीगृहातील रुग्णालयापेक्षा साहजिकपणेच अधिक बरी असे. ती स्वतंत्रता राजबंदीवानास मिळाली तर रुग्णालयातील आतिथ्याचा ते वारंवार अुपभोग घेअू अिच्छितील आणि अेकमेकांच्या चापून भेटी घेत राहतील, या साहजिक भीतीने राजबंदीवानांत बाहेर कोणी आजारी झाला तर अेकदम बंदीशाळेतील रुग्णालयात आणून कोठडीत बंद करण्यात येअी. ह्या शिक्षेची भीती राजबंदीवानांस अितकी वाटे की, शक्यतो ते आजार लपवून कामे करीतच राहत नाही; तर बाहेरची सापेक्ष स्वतंत्रता सुटून आजारी पडण्याच्या अपराधासाठी बंदीशाळेतील कोठडीत बंद होअून पडण्याचा पुनः प्रसंग येणार! अशा रीतीने जरी आजारीपणात अधिक सवलतीची आणि आरामाची आवश्यकता असता त्याच वेळी कोठडीबंदीची शिक्षा मात्र राजबंदीवानांच्या आजारीपणाच्या दुःखास अधिकच दुःखतर करीत असे. तरीही या अडचणीचाही अेक लाभ घेण्यास त्यास सवड सापडे, आणि तो लाभ म्हणजे बाहेर मिळालेली बातमी आत बंदीशाळेत बंद असलेल्या सवंगड्यांस पोचविता येणे हा होय. आजारी पडून कोणी तरी जेव्हा बंदीशाळेतल्या रुग्णालयात बाहेरून धाडण्यात येअी तेव्हा तो आपल्या अंथरुणपांघरुणासहच शक्य तितक्या बातम्याही मिळवून आत येअी. बाहेर वर्तमानपत्रे अधिक सुलभपणे गुपचूप वाचण्यास मिळत असता बाहेर गेलेल्या राजबंद्यांपैकी ज्यास काही बातमी मिळे त्यास बहुतेक काही आजार लगेच होअून तो बंदीशाळेतील रुग्णालयात बंद करण्यास धाडला जाअी! राज्यारोहणाच्या निमित्त स्वदेशात काय झाले ह्याची बातमी काढण्याचे खटपटीत सारे राजबंदीवान असता बाहेरील अेका राजबंदीवानास अेकाअेकी हा

## बातमीचा आजार

झाला. आजारी बंदीवानांत तोही मिसळला. थोडीशी परीक्षा होअून बाहेरच्या बंदीवानास बाहेरच्या प्रशस्त आणि सापेक्षतः आरामकारक रुग्णालयात धाडून अधिकाऱ्याने राजबंद्यास कडकपणे वागविण्याच्या नियमानुरूप ''ले जाव असको जेलमें कोठडीमें बंद करो!'' म्हणून आज्ञा सोडली. राजबंदी त्या कडक हुकुमासच सवलत समजून बंदीशाळेतील रुग्णालयाचे कोठडीत येअून कण्हत बंद होअून पडला.

दुसरे दिवशी नेहमीप्रमाणे दहा वाजण्याचे संधीस मी स्नानास माझे भागाचे हौदावर आलो तो पलीकडल्या भागाच्या चाळीच्या मागच्या खिडकीतून कोणी तरी ''सावरकरबाबू! सावरकरबाबू!'' म्हणून दबून हाका मारीत आहे. मी वर पाहतो तो त्या राजबंदीने माझी दृष्टादृष्ट होताच दोन मजल्यावरील चाळीतून खिडकीला लोंबकळत सांगितले की, **बंगालची विभागणी रद्द झाली!**

मी अैकल्यावरही त्या बातमीवर अेकदम विश्वास ठेवू शकलो नाही. पुनः विचारले, ''काय? बंगालची विभागणी That settled fact is unsettled.'' तो हसला आणि म्हणाला, ''होय होय.'' ''मी म्हटले, राजबंदीवानांच्या सुटकेसारखे हे अेखादे भविष्य-बिविष्य तर सांगत नाहीस ना?'' माझा मित्र म्हणाला, ''मुळीच नाही. पक्की बातमी.'' मी स्नान तसेच सोडून विभागाविभागांतून अितर राजबंदीवानांस बंगालची विभागणी रद्द झाली म्हणून ती बातमी धाडली. लवकरच दिल्लीस राजधानी गेली म्हणून कळले. परंतु त्या बातमीचे काही विशेष महत्त्व नव्हते. पण बंगालची फाळणी रद्द झाली ह्या बातमीमागे अेक त्या विशिष्ट गोष्टीहून अत्यंत महत्त्वाचा असा धोरणाचा, राजनैतिक प्रयोगाचा प्रश्न असल्याने राजबंदीवानांस अत्यंत समाधान वाटले, आणि त्या दिवसी ते आपली वैयक्तिक निराशा विसरून गेले. स्वदेशाचा प्रश्न जर असा यशस्वी रीतीने सुटत असेल तर

## आमची सुटका झाली नही तरी चालेल!

असे अुद्गार त्या तरुणसंघातील प्रत्येकाचे तोंडून निघत होते. बंगालची फाळणी ती काय? ती रद्द झाली हे आनुषंगिक समाधान होते; परंतु खरे समाधान हे होते की, जे म्हटले ते करावयास लावले. जे म्हटले ते करावयास कसे लावावे याचा अुपाय सापडला. अर्थातच त्यापुढे जे म्हणू ते करावयास लावू अशी धमक अुत्पन्न झाली. काहीनी विचारले, ''पण बंगालची फाळणी रद्द झाली या यःकश्चित खेळण्याने संतुष्ट होअून पुनः...! मी म्हटले, ''छेः ती भीती फारशी नको. अेकदा मलेरियाचा ताप क्विनीनच्या गोळीने जातो हे ज्याच्या अनुभवास आले, तो पुनः ताप भासू लागला की आपण होअून क्विनीनच घेअील!''

दिल्लीस राजधानी केल्याने मला काहीच वाअीट वाटले नाही. कारण भावी हिंदुस्थानची राजधानी कोणती असावी, याविषयी राज्यक्रांतिकारकांत जेव्हा जेव्हा तात्त्विक चर्चा चाले तेव्हा तेव्हा **हिंदुस्थानी राजधानी अुज्जयिनी व्हावी** असे मत मी प्रतिपादन करताना सांगतच असे की, जरी अैतिहासिक, सांस्कृतिक, औद्योगिक, भौगोलिक आणि सामरिक दृष्टीने अुज्जयिनी हीच भावी भारताची राजधानी व्हावयास योग्य आहे, तरी राजधानी कोणती व्हावी हा प्रश्न सोडून कोणती बहुधा होअील हा प्रश्न विचारला असता **बहुधा हिंदुस्थानची राजधानी दिल्लीच होअील** असे सांगणे भाग पडते. ह्या माझ्या तर्कानुरूप ती दिल्लीला गेली यात काही वाअीट वाटले नाही. ती राजधानी अुज्जयिनीला गेली असती तर मात्र आनंद झाला असता.

प्रकरण पंधरावे

# अंदमानातील बंदीवानांचे अन्न

हिंदुस्थानात ह्या अुलाढाली चालल्या असता म्हणजे १९११ अिसवीच्या शेवटी आणि १९१२ च्या आरंभी अंदमानच्या बंदीगृहात जवळजवळ अेक वर्ष होत आलेले होते. त्या अुभ्या वर्षात कठिणातले ते कठीण कष्ट सोसूनही आणि बंदीशाळेतले ते अन्न खाअूनही माझी प्रकृती अेकंदरीत बरी राहिली. हे बंदीगृहातील अन्न कसे असे त्याची सर्वसामान्य कल्पना अेक वर्षाच्या अनुभवावरून आता थोडीशी देण्यास हरकत नाही.

## बंदीवानास जे जेवण देण्यात येअी ते

पुस्तकात केलेल्या नियमानुरूप पाहिले असता काही सरसहा अपुऱ्या प्रमाणाचे नसे. अंदमानामध्ये सर्व प्रांतांतील भिन्न भिन्न लोक येत असल्याने जेवण कटोराभर भात आणि दोन गव्हाच्या पोळ्या अितके असे आणि मिश्र पद्धतीचे असे ते ठीकच असे. परिमाणतः साधारण मनुष्यास पुरेसे असे. केवळ कोलूमध्ये काम करीत असताना किंवा चक्की पिसताना मात्र अनेक लोकांस अशा विवक्षित श्रमांत ते अधिक वाढविण्याची परवानगी देण्यात आली तर अन्न कमी मिळते असा प्रतिवाद करण्याचे कोणासही कारण अुरणार नाही. बंदीवानांत प्रथम ते सर्व अन्न खाअूनही भूक न भागणारे काही लोक असत. पण बहुधा हीच स्थिती त्याच बंदीवानांचे अुदाहरणात अेकदोन वर्षांनी पालटून जाअी. बंदीगृहाच्या भयाण छायेत दोनतीन वर्षे राहूनही ज्यांची भूक मेली नाही असे बंदीवान अगदी विरळा. तेव्हा अेकंदरीत अन्नाचे ठरविलेले सरसहा परिमाण अंदमानात बरे आणि पुरेल अितके असे. परंतु त्या परिमाणाप्रमाणे अन्न मिळून बंदीवानांचे तोंडांत ते पडेपर्यंत मध्ये जी विघ्ने येत त्यांना मात्र सीमाच नव्हती. पंजाबी आणि पठाणी मुसलमान हे बहुधा गहू खातात. त्यांना भात नको असतो. ह्याच सद्‌गृहस्थांतून अंदमानमध्ये राजबंदीवान आल्यापासून नियमाने वॉर्डर आणि त्यातही महत्त्वाच्या कष्टदायक कामावरील वॉर्डर बहुधा नेमले जाअू लागल्याने त्यांना लागणाऱ्या निवळ गव्हाच्या पोळ्यांचा पुरवठा अितर बिचाऱ्या बंदीवानांच्या पोळ्यांतून धाकदपटशाने वा लाचलुचपतीने ते करून घेत. बापड्या बंदीवानांनी भातच भात खावा आणि वॉर्डरमहाराजांच्या कटोऱ्यात गुप्तपणे आपल्या पोळ्या टाकाव्यात, नाही तर धमकी मिळालीच – ''बतलाअेंगे तेरेको!'' मग त्यांस कामातच कष्ट दे, त्याचेवर खोटे खटलेच भर अित्यादी प्रकारे त्या बंदीवानांस ते वॉर्डर छळू लागत. हे छळणारे शेकडा ९९ पठाण, पंजाबी आणि सिंधी मुसलमान असत आणि ते अेकमेव स्वतःच्या अन्यायाची दाद वरपर्यंत न जाअू देण्याची दक्षता घेत. तिकडच्या नीचातल्या नीच मुसलमानांतही हिंदूंचा द्वेष अेका धार्मिक कर्तव्याची भावना पावलेला असतो! त्यामुळे जे असे छळले जात त्यात शेकडा ९९ हिंदू बंदीवानच असत.

या वॉर्डरांस तुरुंगातच खावे लागे म्हणून ते ज्याची पोळी घेत त्यास भात तरी केव्हा केव्हा परत देत. परंतु पेटी ऑफिसर आणि जमादार म्हणून बाहेर सोडलेल्या बंद्यांतील जे आत अधिकारी म्हणून आणलेले असत, त्यांना तुरुंगात जेवण्याची आज्ञा नसे. परंतु अिच्छा असे. कारण तुरुंगात जेवून टाकल्याने बाहेर स्वयंपाकाची दगदग आणि पैसा वाचे. ह्या अधिकारीवर्गाची भूक शमविण्यासाठी परत भात न घेताच बंदीवानांस त्यांना आपल्या पोळ्या देअून टाकाव्या लागत! नाही तर त्या दिवशी कोठे तरी पेचात फसून दोन दंडे पाठीत बसायचेच. मिर्झाखान नावाचा जो पठाण तेथे मुख्य जमादार झालेला आणि

## ''छोटा बारी''

म्हणून गाजलेला असे तो तर अितका चढेल झालेला होता की, अनेक वेळा त्याच्यासाठी दहा-बारा पोळ्या गोळा करावयास तो कोण्या पठाण वॉर्डरास डोळ्यांनी खुणवी आणि आपण अन्न वाढीत जाणाऱ्याबरोबर हळूहळू पुढे चाले. पण डोळा त्या पोळ्या गोळा करणारावर असे. त्या वॉर्डराने मागितल्याप्रमाणे अेखाद्या हिंदू बंद्याने पोळ्या दिल्या नाहीत,

की लागलीच मिर्झाखान परत फिरून ज्या दिसेल त्या निमित्ताने निदान पंक्तीत तिरपा बसतोस, अुद्दामपणाने मजकडे पाहतोस म्हणून ओरडून त्यास त्याच्या हातातील सोट्याचे दोन रपाटे पाठीत तेथल्या तेथे हाणी!

अंदमानात बंदीवानास आठवड्यात अेकदा वा दोनदा नरोटीभर दही मिळे. त्या दिवशी तर मोठेमोठे पाण्याचे लोटे भरून भरून, बंदीवानांना वेळेवर मारहाण करूनही त्यांच्यापासून दही घेअून हे पठाण वॉर्डर आणि पेटी ऑफिसर पीत! अेकदा अेका हिंदू बंदीवानाने ते नरोटीभर दही अेका बलुची ऑफिसरास न देता नियमाप्रमाणे पानात पडताच ते भातात मिसळले. ती गोष्ट त्या पेटी ऑफिसरास कळताच त्याने हिंदूंच्या पंक्तीत शिरून त्या हिंदू बंदीवानाचे शेजारी अेक फुटकी नरोटी पडली होती ती दाखवून म्हटले, ''अे हरामी, अे नरोटी क्यों लिया!'' कारण तुरुंगात फुटकी नरोटी जवळ ठेवणेही अपराध आहे! तू नरोटी का ठेवलीस असे म्हणत त्या बलुची मुसलमानाने त्या हिंदू बंद्याची शेंडी धरली आणि त्याच्या पाठीवर लाथा मारीत व हिसडीत जोवर ती शेंडी अर्धी अुपटून हाती आली नाही तो ''काफर! चोटीवाला काफर!'' म्हणून शिव्या देत त्यास मारीत राहिला. बंदीवानाची ओरड अैकून तो ''मोठा जमादार'' म्हणजे मिर्झाखान आला. आणि आपल्याच गटातील अेका पेटी ऑफिसरला पाहून अुलट त्या बंदीवानासच नरोटी बाळगली म्हणून खटला करण्यास नेला. मी हा प्रकार पाहत होतो. मी जाता जाता त्यास खुणेने कळविले की माझी साक्ष दे. त्याप्रमाणे त्याने माझे साक्षीदार म्हणून नाव सांगितल्याने मला बोलावणे झाले. मी जाताच बलुची पेटी ऑफिसर दही मागत होता ते या हिंदू बंदिवानाने दिले नाही म्हणून त्यास ह्याने असे क्रूरपणे मारले म्हणून सांगितले. तेव्हा माझेवरच ओरडून ''छोटा बारी'' म्हणाला 'हुजुर अे बडा बाबू हरबखत हम मुसलमानोंके अूपर झूटी ग्वाही देता है!' मी बंदीपालास सांगितले, ''ठीक आहे. मी खोटी साक्ष देत आहे ना? तर मग आणखी अेक खोटी गोष्ट सांगतो की, आता या वेळेस त्या पत्र्याच्या छपरीत या बलुची पेटी ऑफिसराने चोरून भरून ठेवलेला

## दह्याचा लोटा

आहे! आता चला आणि मी तो दाखवितो.'' बंदीपालास मजबरोबर येणे भागच पडले. तो मिर्झाखान जमादाराच्या हस्तकांस नेहमीच वाचवू अिच्छित असे; पण मी मध्ये पडलेला म्हणून स्वारी अुठली! त्या छपरीत नरोटीच्या ढिगाआड भरून ठेवलेला त्या बलुची पेटी ऑफिसराचा लोटा सापडला. साक्ष माझीच. सुपरिन्टेंडंट पुढे मी त्या हिंदू बंदीवानाच्या केलेल्या अकारण आणि क्रूर छळाची आणि काफर! काफर! म्हणून शेंडी अुपटण्याची माहिती सांगितली आणि जे मी सांगितले तेच

## अंगावरच्या वळांनी आणि दह्याच्या लोट्याने पण सांगितले.

पर्यवेक्षक (सुपरिन्टेंडंट) रागाने लाल झाला आणि अितर पेटी ऑफिसरांसही धाक बसावा म्हणून त्या बलुची पेटी ऑफिसरास तोडून टाकून म्हणजे त्याचा पट्टा हिसकावून घेअून त्यास पुनः कामकरी बंदीवानांत धाडून सक्त कष्टाचे काम करावयास लावले. अशा रीतीने काफराच्या अुपटलेल्या शेंडीने मियासाहेबांची दाढीही पण अुखडून टाकली!

अशा प्रकारे 'छोट्या बारी'च्या म्हणजे जमादार मिर्झाखान याच्याविरुद्ध त्याच्या अन्यायापासून हिंदू बंदीवानांचा बचाव करण्याच्या प्रयत्नाविषयी आम्हासही तो कितीदा पेचात धरी आणि त्याविषयी आम्हास किती छळ सोसावा लागे याचे दिग्दर्शन पुढे थोडेबहुत येअीलच. त्याच्याविरुद्ध साध्या बंद्यांत कागाळी करण्याची कोणाची छातीच नसे. राजकीय बंदीवानच जे काय साहस करतील ते. त्यांतही दहा-पाचच माणसे अितर हिंदूंविषयी कड घेअून मिर्झाखानविरुद्ध खटले भरण्यास धजत. ह्यांतील काही ठळक अुदाहरणे पुढे सांगू. पण येथे ही अेकच गोष्ट अेवढ्यासाठी दिलेली आहे की, बंदीवानास जे अन्न मिळावे म्हणून नियम होते ते फारसे आक्षेपाचे नसूनही ते अन्न बंदीवानाच्या तोंडात पडेतो त्यात ज्या चोऱ्या होत त्यामुळे शेवटी जे अन्न बंदीवानांच्या प्रत्यक्ष ताटांत पडे ते परिमाणाचे मानानेही बहुधा कमी असे.

आता परिमाणाची गोष्ट सोडून दिली तर तेथील जेवणात दुसरी न्यूनता म्हणजे रुचीचीच नव्हे तर आरोग्यप्रदत्वाची होती. अेक वेळ कमी भात द्या, पोळी पोटभर मिळाली नाही तरी चालेल, पण तो भात कच्चा देअू नका, ती पोळी अर्धी भाजलेली, अर्धी जळलेली आणि केव्हा केव्हा कणकेचा ओला गोळा असलेली देअू नका अशी प्रार्थना आम्हांस स्वतः अनेक वेळा करावी लागे. स्वयंपाक सातशे-आठशे माणसांचा. स्वयंपाकी कोण गलिच्छ आणि सरकारी नियमाप्रमाणे काळजी न घेतल्याने केव्हा केव्हा तर भयंकर सांसर्गिक गुप्त रोगाने पछाडलेले! त्यांचे ते घामट कपडे, भर अुन्हात वाढताना तो डोक्याचा घाम त्यांच्या अंगावरून टपटप त्या वरणाच्या आणि आमटीच्या मोठमोठ्या डेग्यांत, पातेल्यांत आमच्या डोळ्यांसमोर गळतो आहे, आणि तीच आमटी आम्हांस भुरकून मिटक्या मारीत खाणे भाग पडलेले! त्या स्वयंपाक्यांचा तरी काय दोष, त्या वाढप्यांचा तरी काय दोष? भर अुन्हात शेकडो बंदीवानांचा स्वयंपाक करून त्यांस वाढताना त्या चार-पाच स्वयंपाक्यांना जीव नकोसा होअी. केवळ गुपचुप स्वयंपाकघरात काही अेखाद-दुसरी भाजी चोरून खाता येअी म्हणून ते ती कामे करीत आणि ज्यांना तरीही ती असह्य वाटत त्यांनी नको म्हणून अैकतो कोण? अशा स्थितीत

## रुचकर जेवण

हा शब्दच बंदीगृहात आम्ही विसरून गेलो होतो. त्यातही बंदीगृहात अपराध्यांस जे कोंडावयाचे ते त्यांना राजासारखे पंचपक्वान्ने झोडावयास कोंडावयाचे नसून संसारातील सुखासच आपण आपल्या स्वार्थांध सुखलालसेपायी केलेल्या सामाजिक अपराधासाठी आचवतो ही जाणीव अपराध्यांत अुत्पन्न व्हावी अितके त्यांचे आयुष्य बंदीगृहात नीरस केले जावे यासाठी हे तत्त्व आम्हांस मान्यच होते. म्हणून जेवण रुचकर नाही ही न्यूनता बंदीगृहात जाणवे ते अेक प्रकारे ठीकही होते. आणि सुक्याबरोबर ओले जळावे त्यानुसार साध्या अपराध्याप्रमाणे राजकीय बंदीवानांसही त्यांचा स्वतंत्र वर्ग न केल्याने, रुचकर अन्न न मिळण्याची पाळी यावी हेही अपरिहार्य असल्याने ते गाऱ्हाणे ते करीतही नसत. परंतु रुचकर नसले तरी

## नीट शिजविलेले आणि आरोग्यप्रद

अन्न मिळावे अितकीच त्यांची मागणी असे आणि अंदमानाचे अन्न बहुधा अत्यंत दुर्लक्षितपणे, घामटपणे, निष्काळजीपणे शिजवलेले आणि आरोग्यास हानिकारक असे हे राजकीय बंदीवानांचे, सर्व बंदीवानांचे वतीने, मुख्य गाऱ्हाणे असे. त्यांना ही गाऱ्हाणी करण्यासाठी 'खोटी गाऱ्हाणी' करता म्हणून कितीकदा शिक्षा झाल्या असतील! परंतु वर्षानुवर्षे ते अर्धेकच्चे, घामट आणि घातक अन्न खातही राजकीय बंदीवान त्या अन्नाविरुद्ध प्रतिवाद करण्यास जिवंत राहिल्याने शेवटी शेवटी अन्न बरेच सुधारले होते. अितर बंदीवानांस राजबंद्यांच्या आड दडून जे अनेक लाभ होत त्यांतील हा लाभ अत्यंत महत्त्वाचा होता. वाअीट अन्न किती वाअीट असे त्याची कल्पना येण्यासाठी काही दोन-चार ठळक अुदाहरणे सांगू. केव्हा केव्हा

## कांजीत घासलेट

पडलेले असे. कांजी पहाटे करावी लागे. थोरली डेग म्हणजे अेक अजस्र तपेले चुलीवर चढे आणि त्यात कांजी शिजे. ती नीट झाली की नाही ते पहाटे अंधारात नीट दिसावे म्हणून घासलेटच्या पत्री चिमण्या हातात घेअून कोणी अर्धाच जागा झालेला स्वयंपाकी त्या डेगेत डोकावी. त्या वेळी त्या भिकार हातचिमण्या गळत असल्याने किंवा पाहता पाहता तेल गळू लागेतो त्या वाकड्या केल्याने सगळ्या कांजीत घासलेट सांडे. पण आठशे माणसांची कांजी फेकता थोडीच येते. ही बातमी वर जाणे देखील त्या स्वयंपाक्यांस आणि मिर्झाखानास घातक म्हणून असे जेव्हा जेव्हा घडे तेव्हा तेव्हा ते ती कांजी तशीच बंदीवानांस वाढीत! आम्ही जाण्यापूर्वी अशी घासलेट पडलेली कांजी दर महिन्या दोन महिन्यांतून अेकदा मिळे. परंतु राजकीय बंदीवान गेल्यानंतर जसजसा तिचा गाजावाजा होअू लागला तशी तशी ती तुरळकपणे येअू

लागली. अेकदा आम्ही अशी कांजी पिणार नाही म्हणून म्हटले असता बारीपर्यंत ते गाऱ्हाणे जाअून तो आत आला. आमच्या शेजारच्या बंदीवानास ओरडून त्याने विचारले ''क्या कांजीमें सचमुचही मटीका तेल (घासलेट) पडा है ?'' त्या बंदीवानास बारीने कोणतीही गोष्ट ओरडून विचारली म्हणजे अुत्तर कसे द्यावे लागते माहीत होते. त्यांनी साफ सांगितले की,

## नहीं साहब! बडा बाबू झूट बोलता है!

तेव्हा बारी रागाने फणफणत मला म्हणाला, सगळ्यांना कांजीस घासलेटचा वास येत नाही, आणि तुला येतो काय? थांब खोटी कागाळी केल्याचा खटला भरतो तुझ्यावर! असे ओरडत ओरडत तो निघून गेला. आणि ती घासलेट पडलेली कांजीच सर्व कैद्यांना खावी लागली. कारण अेक तर दुसरी भुकेच्या तोंडी मिळणार नाही म्हणून काम तसे अुपाशीच करावे लागणार आणि दुसरे त्याहून महत्त्वाचे कारण की

## तुरुंगात वाढले तितके खाल्लेच पाहिजे

फेकता कामा नये, असा सर्वसाधारण नियम. कोणास कमी होवो अधिक मिळणार नाही; जास्त होवो फेकता येणार नाही. ठराविक ते सरसहा खाल्लेच पाहिजे. अशक्त माणसास आणि सशक्त माणसास जे एक सरासरी माप ठरले असेल त्याप्रमाणे अन्न खाअून सरासरीने जगलेच पाहिजे. गोष्ट अशी असते की, अशा नियमाची बजावणी नेहमीच सक्तीने होते असे नाही. परंतु ती बजावणी पूर्वी जेव्हा सक्तीने वरचेवर करण्यात येअी किंवा आजकाल करण्यात येते तेव्हा तिचा बंदीवानाचे प्रकृतीवर वाअिट परिणाम घडल्यावाचून राहत नाही. आपणास प्रामाणिकपणे नको असेलेले अन्न अुष्ट्याच्या कुंडीत फेकले असता ते तेथून बळाने त्याच्याकडून अुचलवून कोण्या अधिकाऱ्याने त्या बंदीवानाकडून खावविल्याची अुदाहरणेही घडत असत! त्या दिवशी ती घासलेटची कांजीही बळाने सगळ्यांस खावी लागली ती याच नियमाचे जोरावर. जर कोणा दहापाच बंद्यांनी ती फेकून दिली असती तर कांजीत खरोखर घासलेट पडले होते असे आम्हांस सिद्ध करता आले असते. आम्ही मात्र ती तशीच फेकून दिली. पण ''भीक नको पण कुत्रा आवर'' असे समजून खटला भरण्याची धमकी लवकरच विसरून गेल्यासारखे दाखवून बारीही चूप बसला.

राजकीय बंदीवान अशा कागाळ्या वारंवार सुपरिन्टेंडंटपर्यंतही नेत आणि जरी वरील अुदाहरणाप्रमाणे त्यांचा बहुधा पाणअुतारा करून तिकडे अधिकारी लक्ष देत नसत तरीही खालच्या अधिकाऱ्याची अेखादे वेळेस सुपरिन्टेंडंट लहरीत असला की गुपचूप चांगलीच कानअुघाडणी करी. अन्नाविषयी अशा कागाळ्या केल्याने बारीला भारी त्रास पडे. तो आपल्या राजबंदीवानातील हस्तकांकडून अशी तत्त्वे अुपदेशवू लागे की

## अन्नासाठी पोटभरू लोकच
## काय ते भांडत बसतात.

त्यास राजबंदीवानांतील झुंजार स्वभावाचे लोक अुत्तरे देत की, आम्ही स्वतः त्याहून वाईट अन्न खाअून राहू. फार काय, अन्नाविणे आठ आठ दिवस अुपास करू, पण हजारो जणांस जिवंत राहण्यास अवश्य अितके सुग्रास अन्न मिळावे म्हणून आम्ही झटत आहो. पोट भरावयाचे असते तर घरी काही आम्ही कोण आयर्लंडच्या रस्त्यावरून अेक शिलिंग रोजमुऱ्यावर राबत नव्हतो. ह्या प्रकारानंतर सर्व राजबंदीवान त्या मिस्टरास धिक्कारू लागले आणि अितर बंदीवान म्हणू लागले की, तुम्ही स्वतःच पहिल्याने घासलेट आहे म्हणून म्हणत होता, तेव्हा त्या मिस्टरांनी शांतपणे अुत्तर केले की, अन्नाविषयी प्रतिकार करणे, पोटभरूपणाचे हलकट कृत्य आहे. परंतु हेच मिस्टर लोक जेव्हा खोबऱ्याचा तुकडा चोरण्यासाठी अर्धा अर्धा तास टपून बसत तेव्हा मात्र तो पोटभरूपणा स्वतःचे पोट भरणारा असल्याने भारी आणि सभ्य कृत्य होअी.

## राजबंदीवानांतील पोटभरू

राजबंदीवानांतील जे कोणी बारीसाहेबाचे पोपट होऊन अन्नासाठी पोटभरू लोकच काय ते भांडतात असे अितरांस शिकवून त्यांस बंदीगृहातील अन्न सुधारण्याच्या कामी प्रतिवाद आणि प्रयत्न करू नका म्हणून म्हणत ते स्वत:च्यासाठी बारीसाहेबांच्या टेबलावरील फळे किंवा तुरुंगात कोणी गुपचुप चटणी चोरून आणली, किंवा कांदा लपवून ठेवला तर तो साभार स्वीकारून चोरून चघळीत बसण्यात पोटभरूपणा मानीत नसत.

परंतु अशा तुसड आणि भ्याड अुपदेशकांना भीक घालण्याअितके काही राजबंदीवानांतले सर्वच लोक खुळे–लोक नसत. ते वारंवार कच्च्या पोळ्या, कमी भात, घासलेट सांडलेली भाजी अित्यादी वस्तू पकडून त्याचा गाजा-वाजा आणि प्रतिवाद करीतच राहत. त्यायोगे शेकडो बंदीवानांस राजकीय बंदीवानांचे आगमन म्हणजे अेक अिष्टापत्तीच झाल्यासारखे वाटत असे. जरी त्यांच्यात बारीसाहेबांविरुद्ध साक्ष देण्याची धमक नसे तरी आतून ते राजबंदीवानांस कृतज्ञ भावाने अनेक प्रकारे साह्य देत; किंबहुना त्यांचे मन:पूर्वक साह्य आणि सादर प्रेम यांचा आधार नसता तर राजकीय बंदीवानांच्या छळास पारावारच अुरता ना. अुघड साक्ष देण्याची त्यांची धमक नसे असे नाही तर **राजबंदीवानांतही बारीविरुद्ध साक्ष देण्याचे धाडस सर्वच करीत नसत.**

अेकदा अेका राजबंदीवानाने घासलेट सांडलेली कांजी पकडली. तो ती खाण्याचे नाकारून बसताच अितरही दोन-चार राजबंदीवान जे त्या भागात होते ते कांजी खाअीनासे झाले. ते पाहताच साधे बंदीही त्यांस थोडेसे मिळाले. होता होता बारी आला आणि दरडावून त्या अुत्तर-हिंदुस्थानीय राजकीय बंद्यास म्हणाला, ‘तू खोटे बोलून बंदीवानांची टोळी बिथरवितो आहेस. पाहा तुमच्यातलेच सूज्ञ आणि समंजस गृहस्थ कसे कांजीविरुद्ध चकार शब्द बोलत नाहीत’ असे ओरडत तो त्याच्या अेका राजकीय बंदीवानांतील ‘माणसाळविलेल्या’ गृहस्थास म्हणाला, ‘‘वेल मिस्टर, कांजीत घासलेट आहे हे खोटे आहे ना?’’ तेव्हा ‘मिस्टर’ म्हणाले, ‘‘मला काही वास येत नाही!’’ झाले. ते समंजस ठरले आणि अितर सर्व बंदीवान खोटे ठरले. बारीच्या नाकाला तर घासलेटचा वास कांजीत ते भरडबा पडले असते तरी येताचना!

## भाजीत गोम व साप

अंदमानमध्ये अेक भयंकर जातीची गोम आहे हे आम्ही मागे सांगितलेच आहे. त्या गोमीची लांबी दीड फूट असून विष जाज्वल्य असते. सकाळी बंदीवानांची अेक टोळी बंदीगृहाकरिता भाजी आणण्यासाठी धाडण्यात येअी. रानात आणि मार्गाने ओसाड जागेत त्या देशात अळू यथेच्छ अुगवते. त्यातच काही पालेभाज्याही अुगवतात. ती टोळी हातात मोठमोठे विळे घेअून ही बेटेची बेटे सरसहा कापीत जाअी व त्या कापलेल्या पाल्याचे ढीगचे ढीग रचून मग ते गाडीत भरून बंदीगृहात धाडण्यात येत. तेच मोठमोठ्या जुड्या करून दोन-चार विळीवर घाव मारून त्या भाजीच्या प्रचंड डेगेत टाकण्यात येत आणि अुबाळले जात. बंदीवानांची भाजी शिजविण्याचा बहुधा हा प्रकार असे. अशा चालढकलीत अितका निष्काळजीपणा केला जाई की, केव्हा केव्हा ह्या भाजीच्या पाल्याच्या ढिगात मोठाल्या गोमी आणि सर्पही त्या डेगेत शिजले जात! अर्धी-कच्ची ती भाजी जेव्हा वाढण्यात येई तेव्हा तेही सपासप वाढले जात. खाताना भाजीतले पान म्हणून अुचलावे तो गोम हाती येई! परंतु अंदमानातील ही गोमीची आणि सापाची भाजी हा जरी अेक आश्चर्यकारक मेवा होताच तरी त्याहूनही आश्चर्यकारक मेवा म्हटला म्हणजे त्या प्रकारच्या भाजीत बारीसाहेबाच्या शब्दाचा आणि समर्थनाचा जो मसाला पडे तो! आम्ही अेकट्यानेच नव्हे तर आणखीही बऱ्याच राजबंद्यांनी स्वत: ह्या गोमी भाजीतून काढून दाखविल्या आहेत. आणि लगेच बारीसाहेबापर्यंत जाअू नये म्हणून प्रतिवादही केलेले आहेत. परंतु त्या निर्ढावलेल्या अधिकाऱ्याने हसून अुत्तरे द्यावी ‘ओ! अिट टेस्ट्स् व्हेरी वेल.’ सुपरिन्टेंडंटपर्यंत कागाळ्या केल्या तरी तेही होस हो करून निघून जात! निरुपायाने गोम किंवा सापाचा तुकडा फेकून देअून बंदीवानांनी ती भाजी तशीच खावी. नाहीतर खावे कशाशी? आणि खाल्ले नाही तरी कामात थोडीच सूट मिळणार! ते काबाडकष्टी काम करावे कशाचे बळावर? हा पेच बारीस माहीत असे आणि म्हणून तो किंवा कोणीही अधिकारी तिकडे फारसे लक्ष देत नसत. केव्हा केव्हा माझ्या आणि माझ्या अितर राजबंद्यांच्या प्रतिवादाचा परिणाम

होऊन बारीस थोडाफार ठपका मिळत असे. अशा वेळेपैकीच अेका वेळेस ह्या गोमीच्या प्रकारावरूनच बारी मला शांतविण्यासाठी गोंजारीत म्हणाले होते, (Oh Mr. Savarkar, don't you think much of these scoundrels) ''अहो सावरकर! ह्या बदमाष लोकांचा विचार सोडून द्या. तुमची समाजातील अुच्च प्रतीची स्थिती मला माहीत आहे. हे पहा

## मी तुम्हा अेकट्याला पाहिजे तर भाजी करवून देतो

पण ह्या सर्व बंदीवानांसमक्ष तुम्ही अन्नाबिन्नातील न्यूने अुघडकीस आणू नका. ती गुरे आहेत! पाहता पाहता ते माझ्या डोक्यावर चढतील. आजवर अशा शेकडो गोमी ह्या लोकांनी गुपचूप फेकून देअून भाजी खाल्लेली आहे. पण त्यांतला कोणी मेलेला नाही!''

अेकूण अशी विषारी भाजी खाअून बंदीवान मेले, की मग ती सुधारण्याची योग्य वेळ येअील अशी बारीसाहेबांची समजूत होती!

दरडावण्याने किंवा गोंजारण्याने अन्नाविषयी किंवा अितर गोष्टींविषयी बारीसाहेबांच्या आणि अेकंदर व्यवस्थेच्या विरुद्ध आम्ही केलेल्या प्रतिवादाची तोंडे बंद न झाली तर ती बंद करण्याचा आणखी एक अुपाय बारीसाहेब आणि मिर्झाखान यांच्यापाशी असे. तो म्हणजे अशा गोष्टीचे, अुदाहरणार्थ, प्रस्तुत प्रकरणी अन्न वाअीट रीतीने शिजविल्याचे किंवा कमी दिल्याचे

## अुत्तरदायित्व कोणा तरी हिंदू पेटी ऑफिसराचे डोक्यावर बळाने लादणे

हा होय. कांजीत घासलेट पडले किंवा भाजीत तेलच घातले न जाता सगळे तेल चोरीस गेले तर त्याचा आम्ही गाजावाजा करताच मिर्झाखानाने बारीपुढे त्या दोषाचा अुत्तरदायी (जबाबदार) म्हणून कोणी तरी हिंदू पेटी ऑफिसर आणून अुभा करावा. बारीने ते जाणूनबुजून खरे मानून आम्हांस सांगावे की, पाहा कांजी बिघडविली म्हणून ह्या हिंदू पेटी, ऑफिसरावर आता खटला भरावा लागेल. अशा वेळी अेका निरपराधी हिंदू बंदीवानास शिक्षा करवून त्याच्या अधिकारावर कोण्यातरी पीडक मुसलमानाची नेमणूक तरी करवावी किंवा 'खटला भरू नका, आम्ही आपले गाऱ्हाणे परत घेतो' असे म्हणून चूप तरी बसावे असा पेच आम्हांस पडे आणि स्वतः आम्ही तरी अशा प्रसंगी बहुधा चूप बसत असू. पण अेका हिंदूस विनाकारण अधिकारावरून काढण्यास कारणीभूत होत नसू.

तथापि, या सर्व अुपायांनीही जेव्हा काही केल्या राजकीय बंदीवानांच्या बंदीगृहातील अन्न सुधारण्याचा अुद्योग होअीना तेव्हा शेवटी आमचे अन्न विशेषतः भाजी आणि पोळ्या सगळ्यांपेक्षा नीट शिजवून भाजून आणल्या जात. पर्यवेक्षक मधून मधून अन्न खाअून पाही. त्यास दाखविण्यासाठी काही चांगल्या पोळ्या भाजून ठेवण्यात आलेल्याच असत. त्याच राजकीय बंदीवानांस वाटण्यात येत. याप्रमाणे

## राजकीय बंदीवानांना तरी थोडेसे बरे अन्न

मिळू लागले हा या चळवळीचा महत्त्वाचा लाभ झाला; कारण त्या वर्गातील लोकांवर बंदीगृहाच्या कुग्रास आणि कच्च्या अन्नाचा परिणाम जन्मभर काबाडकष्ट आणि ओलेकोरडे अन्न यांशी परिचित असलेल्या, सर्वसामान्य बंदीवानांपेक्षा अधिक घातक होअी हे सांगावयास नकोच. आरोग्यकारक अन्न ही विलासाची गोष्ट नसून जगावयाचेच साधन होते. आणि स्वार्थपरायणतेचा लवलेश स्पर्श न झालेल्या, आणि मार्गाचा प्रश्न सोडला तरी परार्थरत असलेल्या त्या कष्टभोगी लोकांचा संघ जिवंत राहणे हे समाजहितास निःसंशय अधिक लाभकारी होते, अशा विश्वासाने आणि बुद्धीनेच ही चळवळ चालली होती. आश्चर्याची गोष्ट ही की, त्या चळवळीत बारीच्या त्रासास भिअून जे चळवळीस पोटभरूपणाची चळवळ म्हणून आपल्या त्या भ्याडपणास छपवू पाहात त्यांसच राजकीय बंदीवानांसाठी जेव्हा बारी स्वतंत्र अन्न काही

अंशी करू लागला तेव्हा त्या नीट भाजलेल्या पोळ्यांवर राजबंदीवान म्हणून अधिकार सांगण्यास मात्र काहीअेक संकोच किंवा पोटभरूपणा वाटला नाही!

राजकीय बंदीवानांस थोडे-फार बरे अन्न मिळाल्याने जरी अेक लाभ झाला तरी त्यायोगे ते स्वस्थ बसले नाहीत. तर वेळोवेळी अितर बंदीवानांस पुढे करून किंवा स्वतः त्यांची अन्नाची गाऱ्हाणी लढून त्यांनी बंदीवानांच्या अन्नात पाच-सहा वर्षांत ठळक फरक घडवून आणला. पुढे अेक पर्यवेक्षक चांगला आला आणि त्याच्या येण्यास आणि त्याच्या चांगुलपणास जागे ठेवण्यास हिंदुस्थानातील वर्तमानपत्रात आणि कौन्सिलात जी अंदमानविषयक चर्चा चालू झाली तिचाही उपयोग झाला. त्यामुळे अन्न हळूहळू सुधारत साधारण बंदीवानांचे हे कष्ट बरेच कमी झाले.

अन्न वाअीट, आरोग्यघातक आणि क्वचित प्रसंगी कमी मिळत असल्याने जितका त्रास होअी तितकाच त्रास खाअीतो ज्या पद्धतीने बंदीवानांस वागविण्यात येअी त्या पद्धतीनेही होत असे; कारण जेवणाच्या वेळेस बंदीवानांच्या पंक्ती भर अुन्हात आणि पावसातही बसविण्यात येत असत. कोणीही पंक्तीबाहेर बसू शकत नसे. या त्रासाचा प्रतिकार करण्यासाठी राजबंदीवानांतील मंडळी अन्न थाळीत पडताच अुठून सावलीत जाअून बसत. पेटी ऑफिसर शिवीगाळ करी. बारीही येअून पंगत सोडली म्हणून खटले करी. बंदीवानांस चिथवितात म्हणून पर्यवेक्षक शिक्षाही ठोठावी; पण राजबंदीवानांतील झुंझार पक्षाचे लोक अुन्हात व पावसात पंगत सोडून छायेत जाअून बसण्यास सोडीत ना. छायेत जेवण्यापुरते तरी का बसू देत नाही ते विचारता बारी सांगे, मी त्या बंदीवानांस सावलीत बसवू तर मजवरच बंदीवानांशी ‘भाअूबंदी’ केल्याचा आरोप वरचे अधिकारी करतील आणि बारीचे म्हणणे अगदी खोटे नव्हते. पुष्कळ वेळ जरी तो स्वतः त्रास देअी व अेकंदरीत जरी बारीचे नाव पुढे येअी तरी बंदीवानांस निष्कारण आणि आरोग्यनाशक त्रास देण्याचे अुत्तरदायित्व सर्वस्वी बारीसाहेबांवरच नसून ते अेकंदर बंदीविभागाच्या धोरणावरच असे, हे ध्यानांत ठेविले पाहिजे.

कारण बंदीगृहातच जेवताना बंदीवानांस अुन्हात आणि पावसातही बहुधा बसविले जाअी असे नसून बंदीगृहाचे बाहेर देखील ज्या जिल्ह्यात बारीहून दुसरे अधिकारी असत त्या जिल्ह्यातही बहुधा तेच हाल होत. अितकेच नव्हे तर त्याबाहेरील जिल्ह्यांपैकी काही भागात

### भरपावसात अुभे राहूनच बंदीवानांस जेवावे लागे.

कपडे पावसात काम करून ओलेचिंब झालेले, थंडीने अंग सारखे कुडकुडत आहे, अशा स्थितीत अेका हातावर पावसात भिजून चिंब झालेल्या पोळ्या आणि भात घेअून पावसाने भरलेल्या आमटीच्या भांड्यातून आमटी भुरकीत ते अन्न बंद्यांस अुभ्यानेच खावे लागे. असे अेकदा दोनदाच होत नसून ही जवळजवळ पद्धतच पडलेली होती! केवळ ज्यांना बाहेर गेल्यावर स्वतंत्र स्वयंपाक करण्याचा अधिकार मिळे त्यांस मात्र हे कष्ट पडत नसत. परंतु राजबंदी बाहेर गेले तरी त्यांस हे अधिकार मिळणारे नव्हते. म्हणून त्या बिचाऱ्यांस कोठेही गेले तरी अेक तर हे हाल तरी सोसावे लागत; नाही तर जे त्यांच्यात हे हाल सोसून निमूटपणे जगण्यापेक्षा ह्या हालांपासून सर्व बंदीवानांची मुक्तता करण्यासाठी झगडत; अधिक हाल झाले तरी सोसण्यास पुढे होत, त्यांस अधिकाऱ्यांच्या रोषास पात्र होअून अधिकच हाल सोसावे लागत. तरीही त्यांच्यातील कित्येक लोकांनी ते सोसले. आतही सोसले आणि बाहेरही सोसले. ह्या अुन्हात व पावसात जेवावयास बसणाऱ्या व अुभे राहून जेवणाऱ्या पंक्तीस अेक ठराविक वेळ देअून (आणि ती किती हे आडदांड पेटी ऑफिसर ठरविणार!) ती वेळ होताच पेटी ऑफिसरने ओरडावयाचे

### अुठो, खाना हो गया, चलो!

बस. पेटी ऑफिसरने म्हटले खाना हो गया की तो झालाच पाहिजे; मग कित्येकांचा तो होवो वा न होवो. ताडकन सगळ्यांनी अुभे राहिले पाहिजे. अुरले ते अन्न पोट रिकामे असले तरी अुष्टे अुमजून कुंडीत जावयाचे. जर कोणी अुठला नाही तर काही काही निर्दय पेटी ऑफिसर हातातील काठी सपासप फिरवीत त्या पंगतीत घुसून थाळ्या अुडवीत, दाणादाण करून सोडीत. कोणी हूं केले की वरतून मार, मागून आज्ञा तोडल्याचा खटला. तरीही ह्या सर्व

